अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्क मान्यता) अधिनियम २००६ नियम २००८ व सुधारित नियम २०१२ नुसार

# वन कार्ययोजना आराखडा

सामुहिक वनहक्काचे संरक्षण व व्यवस्थापन योजना

## ग्रामसभा- सिंसुर

**कालावधी**
**(सन 2022-23 ते 2031-32)**



## तालुका - धानोरा
## जिल्हा – गडचिरोली

| क्रमांक | अनुक्रमाणिका | पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|

# ठराव

**ग्रामसभेचे नाव: सिंसुर**
**ग्राम पंचायतीचे नाव: मोहली**
**तालुक्याचे नाव:** धानोरा
**जिल्हा:** गडचिरोली
**दिनांक:**

**ठराव:**



**क.)** असे घोषित करण्यात येते की, यासोबत जोडलेल्या व्यवस्थापन आराखड्यावर चर्चा झाली आहे आणि सदर व्यवस्थापन आराखडा आजपासून. 10 वर्षे या कालावधीसाठी स्वीकारण्यात आला आहे.
**ख. )** असेही घोषित करण्यात येते की, सोबतचा आराखडा वन विभागाच्या आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा (Management Plan / Micro Plan / Working Plan) यांच्याशी खालीलप्रमाणे सुसंगत राहिल
**i)** सोबतचा व्यवस्थापन आराखडा यापुढे वन विभागाच्या वनव्यवस्थापन आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा यामध्ये अंतर्भूत असेल.
**ii)** वन विभागाच्या व्यवस्थापन आराखडा / चालू आराखडा / सूक्ष्म आराखडा यातील या सामूहिक वन संसाधन व्यवस्थापन आराखड्याशी सुसंगत नसलेला भाग यापुढे वगळण्यात आला आहे असे समजण्यात येईल. वन विभागाने विनाविलंब याबाबत खात्री करावी.
**ग.)** सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती यांना या आराखड्याची प्रत स्थानिक जिल्हा वन संरक्षक यांना पाठविण्याबाबत सूचित करण्यात येत आहे.
**घ.)** याद्वारे असेही घोषित करण्यात येते की, ही ग्रामसभा जेंव्हा गरज भासेल तेंव्हा हा व्यवस्थापन आराखडा सुधारीत करणे, तसेच वन विभागाच्या सुक्ष्म / चालू आराखड्यातील भाग सुधारीत करणे याबाबतचा हक्क राखून ठेवत आहे.
**च.)** यानंतर असेही घोषित करण्यात येते की, कोणीही या सामूहिक वनहक्क क्षेत्रामध्ये व्यवस्थापन, वृक्षारोपण, वृक्षतोड आणि वनांचे पुनरुज्जीवन यासारखे उपक्रम या ग्रामसभेच्या पूर्व सूचित परवानगीशिवाय घेणार नाही.

# 1. आमच्या गावाविषयी

## 1.1. प्रस्तावना

इंग्रजांच्या वसाहत काळात तसेच स्वातंत्र्यानंतर वनांच्या एकत्रीकरणात आदिवासी व वनात पिढ्यानपिढ्या वास्तव्य करणाऱ्या जन समुहावर झालेला ऐतिहासिक अन्याय दूर करण्यासाठी करण्यात आलेला भारत सरकारचा कायदा "अनुसुचित जमाती व इतर पंरपंरागत वननिवासी ( वन ह्क्क मान्य करणे) अधिनीयम 2006 नियम 2008 व सुधारित नियम 2012" नुसार कलम 3(1) नूसार सामुहिक वन हक्क मिळण्याचे अधिकार प्राप्त झाले. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना सामुहिक वन हक्कांतर्गत निस्तार सारखे हक्क, गावाचे सिमेंतर्गत किंवा सिमेबाहेर पारंपारिकरित्या गोळा केले जाणारे वन उत्पादन, त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क, पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने, चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविणेइत्यादी हक्क आहेत.
अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता) अधिनियम 2006 अस्तित्वात आल्यानंतर अनुसुचित जमाती व अन्य पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता)नियम 2008 व सुधारित नियम 2012 तयार करण्यात आले.सुधारित नियम 2012 चे नियम 4(1)(च) नुसार अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासीं यांच्या फायद्यासाठी अश्या सामुहिक वन संसाधनाचे शाश्वत व समसमान व्यवस्थापन करण्यासाठी सामुहिक वन संपत्तीचे संवर्धन करण्याची व तीचे व्यवस्थापन करण्याची योजना तयार करणाऱ्या वन विभागाच्या सूक्ष्मदर्शक आराखडा किंवा कार्यआयोजना किंवा व्यवस्थापन योजनाबरोबर संवर्धन व व्यवस्थापन योजना समितीला करणे आवश्यक वाटेल अश्या फेरबदलाविषयी एकत्रीकरण करणाऱ्या खंड (ङ) नुसार गठीत करण्यात आलेल्या समितीचे संनियंत्रक व नियंत्रण करणे अशी जबाबदारी ग्रामसभाना देण्यात आली. कायद्यातील नियम 4(1)(च) च्या तरतूदीनुसार कर्तव्ये पार पाडण्यासाठी ग्रामसभा तिच्या सदस्यामधून नियम 4(1)(ङ) नुसार स्थापन केलेल्या समितीला "सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती" (Community Forest Rights Management Committee)असे संबोधण्यात यावे. सदर समितीचे संनियंत्रन व

नियंत्रन ग्रामसभा करेल. ग्रामसभेतील सामूहिक वन संपत्तीचे संवर्धन व व्यवस्थापन योजना तयार करणे, नैसर्गिक साधन संपत्तीच्या व्यवस्थापनातून प्राप्त होणारा महसुल तसेच शासनाकडुन प्राप्त होणारा निधी यांचे बँक खात्यामार्फत संनियंत्रण करणे, जमाखर्चाचे लेखे व लेखापरिक्षण ठेवणे इत्यादी प्रशाकीय बाबी पार पाडण्याकरीता सदर समिती ही वनहक्क कायद्याच्या अंमलबजावणीसाठी ग्रामसभेची कार्यकारी समिती असेल.त्यामुळे सामुहिक वन हक्कांतर्गत प्राप्त क्षेत्राचा आराखडा तयार करणेची जबाबदारी ग्रामसभा व ग्रामसभाद्वारे  नियुक्त सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीस या कायद्याने देण्यात आली आहे.त्यानुसार आराखडा तयार करण्यात आला आहे.

## 1.2 पार्श्वभूमी

सिंसूर ग्रामसभेची एकुण लोकसंख्या 165 व कुटुम्ब संख्या 38 आहे, गावात 4 थी प्रयन्त जिल्हा परिषद शाळा आहे. गवात पाण्याची उत्तम व्यवस्था असुन मेन रोड पासुन ते गावा पर्यंत डाम्बर रोड नसुन कच्चा रोड आहे. सिंसुर ग्रामसभेला 6 मे 2013 रोजी सामूहिक वनहक्कांचे हक्क जोडपत्र 3 मिळालेले आहे.व त्या जोडपत्रात एकूण 877.47 हेक्टर आर एवढे क्षेत्रफळ मिळाले आहे. परंतु पूर्ण सीमांकन केल्यानंतर त्याचे क्षेत्रफळ 1800.57 हे.आर एवढे भरते.

गावाला वनहक्क सरकार ने दिले म्हणजे आता सर्व जल,जंगल,जमीन ही गावकर्यांचीच झाली परंतु याच अर्थ असा नाही की आता आपण पूर्ण जंगल सम्पवून टाकायचं, तर या जंगलाला पुन्हा वेगवेगळ्या जैवविविधतेने सजवायची जिमेदारी सुद्धा सरकारने आपल्याला दिली आहे.

आतापर्यंत जंगल आपला नाही अशी समज धरून आपल्याला जंगलातील काही वस्तू आणायची असल्यास ते खोडासकट किंवा मुळासकट आणायचे परंतु आता मात्र हे जंगल आपलाच धन आहे तर त्याला कोणत्या पद्धतीने जपायचे त्याची कशी रक्षा करायची याचा सर्व मिळून विचार विनिमय करून योग्य निर्णय घेणे आवश्यक होते. त्यासाठी करायची उपाययोजना म्हणजे आपल्या जंगलाची कार्ययोजना .

तर ती कशी राहील आतापर्यंत फॉरेस्ट डिपार्टमेंट कशा पदडतीने जंगलाच सौरक्षण करत असे ते आम्हाला माहीत आहे.  ते सुद्धा आपल्या कार्ययोजना प्रमाणे काम करीत असे. मग आपण ही तशीच करायची का? की वेगळी करायची.

तर फॉरेस्ट डिपार्टमेंट च्या कार्ययोजना मध्ये फक्त टिम्बर म्हणजेच इमारती लाकूड यालाच सर्वात जास्त महत्व असे. मग आपल्याला ही विचार करायला पाहिजे की आमच्या गावासाठी आणि लोकांसाठी काय काय आवश्यक आहे, आपल्या घरापूर्ती इमारती लाकूड,इंधनासाठी जळाऊ लाकूड,खाण्यासाठी वासते, आपली थोडीफार पैशाची गरज भागविण्यासाठी गौणवनोपज(चार,आवळा,डिंक इ.), आपल्या गुरांसाठी चारा,आणि फार महत्वाचा म्हणजे आपले लाखो रुपये वाचवून आपला करोडो रुपयाचा जीव वाचवणार्या औषधी वनस्पती.

एवढे सारे गोष्टी आपल्याला वनहक्का अंतर्गत मिळाले आहेत मग याचा फायदा फक्त आपणच घेऊन सोडायच का? नाही, तर ते पिढ्यानपिढ्या टिकले पाहिजे आणि आपल्या समोरच्या सर्व पिढी पर्यंत पोहचलीच पाहिजे यासाठी आपल्याला या सर्व गोष्टींचा विचार करून , आपली गरज,गुरांची गरज,जंगलातील प्राण्यांची गरज या सर्वांची गरज भागवून पुन्हा वाचेल आणि पुन्हा टिकून राहील अशापद्धतीची कार्ययोजना तयार करायची आहे. आणि आम्ही सर्व मिळून सर्वांच्या सहकार्याने ही कार्ययोजना तयार करीत आहोत.

**आमची ग्रामसभा**

**ग्रामसभेचे नाव:-** सिंसुर



**ग्रामपंचायत:** मोहली
**तालुका:** धानोरा
**जिल्हा:** गडचिरोली
**सेन्सस कोड:** 538937
**अ.अक्षांश** : 20.374961N
**ब. रेखांश** : 80.253507E
**जोडपत्र दिनांक:** 05/05/2013

**वनाधिकार अभिलेख (जोडपत्र)**

| हक्क | होय/नाही | शेरा |
|---|---|---|
| 1) निस्तार हक्क | होय | निस्तार पत्रका प्रमाणे मान्य |
| 2) गौण वनोत्पादनावरील हक्क | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (ग) प्रमाणे मान्य |
| 3) अन्य सामूहिक हक्क जसे- अ) वापर किंवा हक्कदारी असलेले (जल)<br>ब) चराई ( जंगल) | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (घ) प्रमाणे मान्य |
| 4) जैविक विविधता, बौद्धिक संपत्ती व पारंपरिक ज्ञान यांच्या हक्कांची सुगमता. | होय | जैवविविधता कायद्यानुसार गठीत ग्रामस्तरीय समितीला हक्क |
| 5) अन्य पारंपरिक हक्क. | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (झ) प्रमाणे मान्य |



## 1.3 इतिहास

सिंसुर हा गाव पूर्वी जंगल होता या जंगलामध्ये एक आतला व नरोटे या आडनावाचा आला होता तेव्हा गावाचा नाव नव्हत ,जंगलाच्या सानिध्यात होता नंतर निघुन गेला त्याच्या नंतर कुबेल सिंग हलामी हे व्यक्ती येऊन रहायला लागले .येऊन दहा ते पंधरा वर्षे झाल्याच्या नंतर महाराजाच्या मालो राणीने गावा सिंसुर म्हनून घोषित केले .सिंसुर हे गाव आधीपासून डोंगराच्या पायथ्याशी आहे .त्याच्यामुळे ज्यास्त मोठी वस्ती झालेली नाही .सिंसुर या गावात एक दहा घराच पाडा (टोला)आहे .

लोक पूर्ण या गावात आदिवासी समाज आहे व लोक पूर्णपणे आधीपासूनच जंगलाची जोपासना करून जंगलावर आधारित आहेत.ह्या गावामध्ये आतापर्यंत दळण वळणंचा साधन नाही .शिक्षणाची सोय नाही,आरोग्याची सोयी सुविधा नाही,लोक पहिले पासून दऱ्या खोऱ्यात असल्यासारखे जीवन जगत होते .जंगलामधून जे भेटायचे जस पशु,पक्षी,प्राणी,फळ,फुल,कंदमूळ,खाऊन पॉट भरायचे आणि कालांतराने

शेती करण्यास सुरुवात केले तेव्हा जमीनदारी पद्धत चालत होती जमीनदाराला विचारल्या शिवाय जमीन काढता येत नव्हतं आणि जमिन काढला असेल तर पीक चांगला येत असेल तर जमिनदारालाच द्यावं लागे व गावामध्ये पाटील शाही चालत होती .
गावचा पाटील हा राजाला मिळून काम करायचा आणि राजा हा गावच्या पाटलालाच कोणतेही गावचे काम सांगायचं म्हणून पाटला ला किव्हा राजाला शेती भरपूर असायची नंतर काही दिवसांनी जमीनदारी पद्धत बँद झाली आणि लोक शेती काढून जीवन स्वतंत्र जगायला लागले.तेव्हा पासून लोक जंगलात राहून शेती व जंगल सांभाळून जीवन जगत आहेत.गावात पहिले शिक्षण कोणीही घेत नव्हते गावात शिक्षणाची सोय नव्हती आता गावामध्ये १ ते ४ वर्ग  घेतले जाते गावात शाळा आली आता गावात जे नवीन पिढी तयार होत आहे तेच शिक्षण घेत आहे आणि शिक्षणाची कुठतरी गंगा गावात पोहचायला लागली.गावामध्ये आता एकून पंचवीस घरे आहेत आणि लोकसंख्या एकशे सतावीस आहे.

## 1.4 गावाची प्राथमिक माहिती

| | |
|---|---|
| **गावाचे नाव** | सिंसुर |
| **ग्रामपंचायत** | मोहली |
| **तालुका** | धानोरा |
| **जिल्हा** | गडचिरोली |
| **गावातील कुटुंबाची संख्या- 31** | अनुसूचित जमाती(ST)- 31 |
| **पुरुष लोकसंख्या** | 80 |
| **स्त्री लोकसंख्या** | 85 |
| **एकूण लोकसंख्या** | 165 |
| **अनुसूचित जमाती लोकसंख्या** | 165 |
| **किती टोले आहेत (नावे लिहा)** | कोवाची टोला, हलामी टोला |

## 1.5 गावाची भौगोलिक माहिती

| अ. क्र. | खात्याचे प्रकार | क्षेत्र हे. |
|---|---|---|
| 1 | वन | 877 |
| 2 | झुडपी जंगल | 0 |
| 3 | आखर | 2 |
| 4 | गावठाण | 2 |
| 5 | तलाव/बोडी | 10 |
| 6 | मसानवट | 2 |
| 7 | ढोरफोडी | 0 |
| 8 | पाट | 7 |
| 9 | खातखुड्या | 0 |
| 10 | रस्ते | 4 |
| 11 | नदी/नाले | 5 |
| 12 | पोटखराब | |

| | एकूण क्षेत्र | 909 |
|---|---|---|
| अ. क्र. | खात्याचे प्रकार | क्षेत्र हे. |
| 1 | बागायत | 0 |
| 2 | जिरायत | 150 |
| | एकूण | 150 |

## 1.6 गावाची व्यवसाया संबंधी माहिती

| व्यवसाय | कुटुंबाची संख्या |
|---|---|
| शेती | 31 |
| पशुधन | 31 |
| दुधाचा व्यवसाय | 0 |
| वनउपज गोळा करणारी कुटुंब | 31 |

## 1.7 पोलो – निसर्गाशी संबंधित सन

| नाव | वेळ | निसर्ग संपदा |
|---|---|---|
| मोहडोंरी पोलो | 3 रा महिन्यात | मोहडोंरी पोलो केल्याशिवाय मोह फुल वेचत नाही हो ळी चा सण झाल्यावर मोहडोंरी पोलो करतात |
| सँजोरी पोलो | धानाची कापणी झाल्यानंतर | सँजोरी पोलो केल्याशिवाय धान पिकाची मडणी करत नाही |
| दसरा पोलो | 10 वा महिन्यात | दसरा पोलो केल्याशिवाय कोहळा खात नाही दसरा पोलो झाल्यानंतर कोहळा खायला जमतो |
| नवा पोलो | 9वा महिन्यात | नवा पोलो धानाचे फुलांची पुजा करतात व तेव्हा नवीन धान किंवा तांदूळ खातात |
| बिजोरी | जून | बिजोरी पोलो केल्या शिवाय शेतात धांन टाकत नाही |

## गावातील सामुहिक देवस्थान

| अ.क्र. | नाव | स्थान |
|---|---|---|

| | | |
|---|---|---|
| 1 | नार माता/ गाव माउली/ माराई | गावात |
| 2 | गढ माता | जंगलात |
| 3 | पाट देव | जंगलात |
| 4 | ठाकूर देव/चिकाटी/ भूम्याल / तल्लूर मुते | जंगलात |
| 5 | भीम देव | जंगलात |

## 1.8 संघटन

गावामध्ये कोणतेही सामूहिक काम करायचे असल्यास त्यासाठी एखादी संघटना किंवा समिती असणे आवश्यक आहे. अन्यथा तो काम कधीच चांगला होत नाही कारण त्या कामावर कुणाचीही लक्ष राहत नाही.त्यामुळे गावामध्ये सुद्धा असे काही समित्या स्थापन करणे आवश्यक असते.

1) वनहक्क समिती
2) सनियंत्रण समिती
3) जैवविविधता समिती
4) बँकेच्या व्यवहारासाठी समिती
5) वेगवेगळे पास देण्यासाठी समिती
6) तंटामुक्त समिती
7) लेखापाल

यासाठी योग्य व्यक्ती आणि गरजेनुसार समिती तयार करणे आवश्यक आहे.



## 1.9 इतर ग्रामसभा व महासंघाशी संबंध

प्रत्येक ग्रामसभा आप आपली संघटना तयार केली आहे.गावातील  संघटना गावा पुर्ती मर्यादित असते. कोणतेही गौण उपज अधिकारा प्रमाणे ग्रामसभा करते.उदा.तेंदु व बांबू व इतर वनोपज,तर ठेकेदाराला या मालाची गरज असते.आपणाला माल विकण्याची गरज असते.कोणतेही गौण उपज काही विशिष्ट कालमर्यादा पर्यंत टीकु शकते.याची जाणीव ठेकेदाराला असते.आणि आपणाला असते.म्हणुन ठेकेदार मिळेल तेवढ्या कमी किमतीत उचलण्याचा प्रयत्न करतो कारण  आपणाकडे साठवणूक साठी नाही. पण आपली दहा पंधरा गावाची एक संघटना असेल तर मात्र ठेकेदाराला पर्याय नसतो. त्याला माल घेणेच असतो.म्हणुन महासंघ तयार करणे आवश्यक आहे.

१) एक दुसऱ्याला मदत मिळते.व एक दुसऱ्या
पासून बरेच काही शिकायला मिळते.
२) ग्रामसभाचा महासंघ तयार झाला तर आपुलकी,स्नेह निर्माण होते.
३) ठेकेदार, व्यापारी, दलाल व राजकारणी लोकांपासून फसवणूकीचे धोका कमी असतो.
४) कोणतेही काम करायला सोपे जाते.उदा.तेंदु लिलावाची जाहिरात प्रसिद्ध करणे.खर्च कमी येतो.
म्हणुन इतर ग्रामसभा व महासंघाशीसंबंध ठेवणे योग्य आहे.

## 1.10 गावात असलेल्या सुविधा

गावातील सेवा, सुविधा आणि त्यांचे अंतर खालील प्रमाणे आहे–

| अ.क्र. | सुविधा व यंत्र संसाधन | हो/ नाही | अंतर |
|---|---|---|---|
| 1 | प्राथमिक शाळा | हो | गावात |
| 2 | मिनी अंगणवाडी | हो | गावात |
| 3 | गट ग्रामपंचायत कार्यालय | हो | 4 किमी |
| 4 | आरोग्य उपकेंद्र | हो | 4 किमी |
| 5 | तलाठी कार्यालय | | 4 किमी |
| 6 | स्वस्त धान्य दुकान | हो | 2 किमी |
| | पोष्ट ऑफिस | | 4 किमी |
| | तालुका | | 14 किमी |
| | जिल्हा | | 39 किमी |

## 1.11 पशुधन माहिती

| अ.क्र. | पशुधनाचे प्रकार | संख्या |
|---|---|---|
| 1 | गाय- बैल | 200 |
| 2 | म्हैस- रेडे | 2 |
| 3 | शेळी/बकरे | 90 |
| 4 | कोंबडी | 250 |
| 5 | डुक्कर | 2 |

## 1.12 कृषी पिके हंगाम माहिती



| अ.क्र. | हंगाम | खरीप (हो/नाही) | रब्बी (हो/नाही) |
|---|---|---|---|
| 1 | धान | हो | हो |
| 2 | भाजीपाला | नाही | हो |
| 3 | तूर | नाही | हो |
| 4 | चना | नाही | हो |
| 5 | मुंग | नाही | हो |
| 6 | जवस | नाही | हो |
| 7 | उळीद | नाही | हो |
| 8 | मका | नाही | हो |
| 9 | शेंगदाणे | नाही | हो |

## 1.13 पावसाची सरासरी

| वर्ष | पाऊस (मी.मी.) |
|---|---|
| 2015 | 848 |
| 2014 | 1266 |
| 2013 | 2368 |
| 2012 | 1568 |
| 2011 | 1214 |
| 2010 | 1769 |
| 2009 | 1124 |

| | |
|---|---|
| 2008 | 1272 |
| 2007 | 1874 |
| 2006 | 1564 |
| 2005 | 1682 |
| 2004 | 1315 |

## 2. वन व्यवस्थापन आराखड्याविषयी

### 2.1 उद्देश आणि कृती

| उद्देश | कृती |
|---|---|
| 1) वनाचे संरक्षण करणे:- | 1. वनाचे वनव्यापासुन ऱ्हास थांबवणे.<br>2. निसर्गातून मिळणाऱ्या विविध लाभांना, गौण उपजांना वाढविणे व टिकवून ठेवणे<br>3.आपल्या जंगलातून चोरी होणाऱ्या मालाला रोख लावणे व दंडात्मक कार्यवाही करणे.<br>4.जंगल सौरक्षण साठी गावात नियमावली तयार करणे.<br>5.सीमांकन करणे.<br>6.रोपवाटिका तयार करणे.<br>7.औषधी वनस्पती व चराई साठी चारा तयार करणे.<br>8.वनस्पतींची यादी बनवणे.<br>9.वेगवेगळ्या भुद्दश्यांची यादी बनवणे.<br>10.जंगलाचे शाश्वत पद्धतीने वापर करणे.<br>11.वेगवेगळ्या भुद्दश्यांची नकाशे तयार करणे.<br>12वनस्पती लागवडी नंतर त्यांची निघा राखणे.<br>13.वृक्षांची दर हेक्टरी संख्येचा अंदाज काढणे. |
| 2) जंगलातील जैवविविधतेचे संरक्षण :- | 1) आपल्या जंगलातील जैवविविधतेचे नुकसान होत असल्यास त्यासाठी कृतिशील असणे.उदा. शिकार, अवैध मासेमारी असे अवैध काम होत असल्यास त्यास प्रतिबंध घालणे.<br>2) नष्ट होणाऱ्या वनस्पतींची कारणासहित नोंद ठेवणे |
| 3) स्थलांतर थांबवणे | 1) गावातील तरुण मुलं गावात काम नाही मिळत म्हणून बाहेर कंपनीमध्ये जातात परंतु ठेकेदाराकडून त्यांची फसवणूक होऊन वापस गावात येतात असे प्रकरण थांबविणे. तसेच<br>2) गावातील लोकांना बाहेर रोजगारासाठी जाण्याची वेळ येऊ नये यासाठी गावातच वर्षभर काम पुरले पाहिजे यासाठी वेळोवेळी रोजगार हमी किंवा इतर योजनेच्या माध्यमातून काम उपलब्ध करून देणे. |
| 4) रोजगार हमी योजना ग्रामसभा स्वतः राबवेल यासाठी प्रयत्न करणे. | वनहक्क च्या कलम ३(१)(e) नुसार रोजगार हमी यंत्रणा घोषित करणे. |
| 5) ग्रामसभेची फसवणूक टाळणे | 1) गौण वणोपजाची खरेदी ग्रामसभेतच करणे व ग्रामसभेतर्फे त्याची विक्री करणे.<br>2) गौण उपजांची मूल्यसंवर्धन व विक्री साखळी तयार करणे.<br>3) तेंदु व बांबू प्रक्रिया स्वतः ग्रामसभे मार्फत करणे.<br>4) गावात नियम तयार करणे,उदा,(ग्रामसभेचे , जंगलाचे, गौणउपज वापराचे, आर्थिक व्यवहार, निस्तार काढण्याचे ,इत्यादी) |

## 2.2 सामुहिक वनसंपत्ती क्षेत्राचा तपशील

### गावाच्या गावहद्दी येणाऱ्या वनक्षेत्राची माहिती खालील प्रमाणे-

**A) कंपार्टमेंट नंबर तपशील :-**

| अ.क्र. | कंपार्टमेंट नंबर | राखीव जंगल | संरक्षित जंगल | इतर | एकूण क्षेत्र |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 601 | | | | |
| 2 | 620 | | | | |
| 3 | 602 | | | | |
| एकूण क्षेत्र | | | | | |

**B) सर्व्हे नंबर तपशील :-**

(* स.मो.झा.जं - सरकार मोठ्या झाडाचे जंगल)

| अ.क्र. | सर्व्हे नंबर | विभाग | क्षेत्र हेक्टर | | अ.क्र. | सर्व्हे नंबर | विभाग | क्षेत्र हेक्टर |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 16/1 | स.मो.झा.जं | 778.43 | | 2 | 22 | स.मो.झा.जं | 2.73 |
| 3 | 29/1 | स.मो.झा.जं | 95.83 | | 4 | 33 | स.मो.झा.जं | 3.15 |
| एकूण क्षेत्र :- 880.14 हे. | | | | | | | | |



**वनक्षेत्राच्या चतु:सीमा ची माहिती -**

**पूर्व-** 601,मोडेभटी आहे सीमा वाद चालू आहे

**पश्चिम-** 618,जांभळी व आस्वालपार आहे

**उत्तर–** 623,भांशी ,निमगाव , मेंढा

**दक्षिण-** 667,जागदा ,मोहली ,चिंगली

## 2.3 सीमा व हद्दीची स्थिती

सीनसुर गाव व सीमा हद्दीत सद्या पूर्व दिशेला जगलं व बांबू भरपूर आहे परंतु सीमा हद्दी चा वाद चालू आहे पश्चिम दिशेला बांबूची व जनगलाची चोरी होतो व उत्तर दिशेला सीमा दूर असल्या मुडे जनगलाची चोरी होतो व दक्षिण दिशेला सीमा जवड असल्यामुडे व डोंगर भाग असल्यामुडे चोरी होत नाही.

## 2.4 समुदायीक वन हक्क प्राप्त जंगलावरील सद्यस्थितीतील अडचणी व धोके

1) **आंतरिक धोके :-** वणवा, वृक्षतोड, अतिक्रमण,बिमारी, हवामान बदल
2) **बाह्य धोके:-** वणवा, वृक्षतोड,चोरी,

## 2.5 जमिनीचा वापर तक्ता:

| जमिनीचा वापर | क्षेत्रफळ (हे) |
|---|---|
| स्मशान भूमी | 2 |
| जंगल | 1700 |
| गावठाण | 1 |
| शेती | 50 |

## 2.6 भूभाग/जलभाग यादी

| तुकडा क्रमांक | भुदृश्य प्रकार | भूरचना |
|---|---|---|
| 1 | २९. दाट वृक्ष मैदानी (बांबू) | उंचसखल |
| 1 | ३० शेती | उंचसखल |
| 1 | ३० शेती | सपाट |
| 2 | ११. दाट वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 1 | ११. दाट वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 1 | ७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 2 | ७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 2 | ८. मध्यम वृक्ष खडकाळ (मिश्र) | सपाट |
| 1 | ८. मध्यम वृक्ष खडकाळ (मिश्र) | कमी चढ |
| 1 | २७ . दाट वृक्ष डोंगराळ (बांबू) | उभा चढ |
| 1 | २५. मध्यम वृक्ष डोंगराळ (बांबू) | उभा चढ |
| 1 | २१.विरळ वृक्ष डोंगराळ (बांबू) | मध्यम चढ |
| 1 | १७. खूप कमी वृक्ष डोंगराळ (बांबू | उभा चढ |
| 2 | ३. खूप कमी वृक्ष डोंगराळ (मिश्र) | कमी चढ |
| 1 | ३. खूप कमी वृक्ष डोंगराळ (मिश्र) | मध्यम चढ |
| 2 | १. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 1 | १. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 2 | ४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 1 | ४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |

## 2.7 ग्रामसभेद्वारा सीमांकन केलेला नकाशा – परिशिष्ट 1



## 2.8 वनक्षेत्रातील टापू (पारंपारिक/विशिष्ट नावाने ओळखल्या जाणारी जागा) माहिती

1,गिट्टी खदान 2,दोडरी मेटा 3, कोरोप गुडररा 4,गुडररा पला 5,दोडरी गुडररा 6,बेयसिंगर पला 7,गीदाल पला 8,सोनसाय मेटा। 9,नेडेर पला 10,तोंदे मेटा 11, ओडचे पला 12,दालदेवन मेटा 13, क्लोर गुडररा 14, लयाहपाडी 15, कड्या पला 16,बंड्रीन पल्ला 17,पाथर गोटा 18,सोनसाय पला 19 ,अडजाल गुडरा 20,गोहडुम पल्ला 21,टिटेर आदी 22,शेडोन पल्ला 23,शेडोन बूड्डी 24,जोडा मेटा 25,हिवर पल्ला 26,सावली गुडरा 27,कोहका मेटा 28,तोंदे मेटा,29,कोपान गुडरा 30,गोहडुम मेटा

## 2.9 वृक्षांचा विविध भूभागावर संख्यात्मक अंदाज

| भुदृश्य प्रकार | १. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र) | | |
|---|---|---|---|
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कसाई | 0.83537133 | 0.351661944 |
| 2 | गोगर | 0.83537133 | 0.14957266 |
| 3 | तेंदू | 0.83537133 | 0.215384631 |
| 4 | धावडा | 2.50611398 | 0.540455879 |
| 5 | पड री | 0.83537133 | 0.351661944 |
| 6 | भेरा | 1.67074265 | 0.170209765 |
| 7 | मोवई | 0.83537133 | 0.112345687 |
| 8 | मोह | 0.83537133 | 0.170180449 |
| 9 | मोहा | 3.3414853 | 1.043020018 |

| | | | |
|---|---|---|---|
| 10 | येन | 1.67074265 | 0.242640093 |
| 11 | रोहन | 0.83537133 | 0.38290601 |
| 12 | लोकांडी | 0.83537133 | 0.170180449 |
| 13 | सागवन | 0.83537133 | 0.130294406 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **16.70742652** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **१०. दाट वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कडम | 6.70391701 | 2.028560608 |
| 2 | कसाई | 6.70391701 | 1.452401382 |
| 3 | काकीई | 6.70391701 | 1.200331721 |
| 4 | कोजब | 13.407834 | 1.366291718 |
| 5 | ग राडी | 20.111751 | 2.980717077 |
| 6 | गोगर | 6.70391701 | 1.045622299 |
| 7 | गोटी | 6.70391701 | 0.192053075 |
| 8 | चारोडी | 6.70391701 | 0.225395623 |
| 9 | तेंदू | 6.70391701 | 2.352650173 |
| 10 | धावडा | 6.70391701 | 1.54175941 |
| 11 | फर्लांग | 6.70391701 | 0.192053075 |
| 12 | बांबू | 261.452763 | 0 |
| 13 | बाबू | 6.70391701 | 0 |
| 14 | बाहवा | 6.70391701 | 1.045622299 |
| 15 | बीजा | 20.111751 | 12.99185706 |
| 16 | बेल | 6.70391701 | 0.929536885 |
| 17 | मोवई | 20.111751 | 3.516971942 |
| 18 | येन | 6.70391701 | 1.925865561 |
| 19 | वड | 13.407834 | 11.28906969 |
| 20 | शिसम | 20.111751 | 4.940031882 |
| 21 | ससागवन | 6.70391701 | 1.54175941 |
| 22 | साग | 13.407834 | 1.107132631 |
| 23 | सागवन | 87.1509211 | 22.55333945 |
| 24 | सालई | 6.70391701 | 1.090914816 |
| 25 | सावली | 13.407834 | 7.004602442 |
| 26 | सिहना | 13.407834 | 4.081127851 |
| 27 | सूर्या | 20.111751 | 0.298621726 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **616.7603645** | |
| | | | |

| भुदृश्य प्रकार | ११. दाट वृक्ष मैदानी (मिश्र) | | |
|---|---|---|---|
| क्र. | वृक्ष | वृक्ष संख्या प्रती हेक्टर | खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.) |
| 1 | Bhehara | 11.8013865 | 1.241992146 |
| 2 | Bija | 11.8013865 | 4.220801136 |
| 3 | Dhavada | 11.8013865 | 0.360999456 |
| 4 | Dhavda | 23.6027729 | 0.169042409 |
| 5 | Garadi | 35.4041594 | 0.277605201 |
| 6 | Jhilbuli | 11.8013865 | 0.135609577 |
| 7 | Kakai | 11.8013865 | 0.500459444 |
| 8 | Moha | 47.2055459 | 4.281844228 |
| 9 | Movai | 23.6027729 | 0.610149185 |
| 10 | Salai | 11.8013865 | 0.253939264 |
| 11 | Sihana | 11.8013865 | 0.073627361 |
| 12 | Tendu | 23.6027729 | 0.921187218 |
| 13 | Yen | 47.2055459 | 0.448713684 |
| 14 | गराडी | 70.8083188 | 5.999596844 |
| 15 | घोटी | 11.8013865 | 0.181814502 |
| 16 | चारोडी | 47.2055459 | 13.21348166 |
| 17 | चारोळी | 11.8013865 | 0.115042751 |
| 18 | चीचवा | 11.8013865 | 1.352339275 |
| 19 | तेंदू | 35.4041594 | 2.834747292 |
| 20 | धावडा | 35.4041594 | 14.70631396 |
| 21 | बांबू | 35.4041594 | 0 |
| 22 | बीजा | 23.6027729 | 5.501391299 |
| 23 | बेहळा | 11.8013865 | 0.571363344 |
| 24 | भिवला | 59.0069324 | 25.17792775 |
| 25 | मोवई | 23.6027729 | 3.15132616 |
| 26 | मोहा | 70.8083188 | 2.579117604 |
| 27 | येन | 47.2055459 | 2.355324237 |
| 28 | लोगडी | 11.8013865 | 0.073627361 |
| 29 | शिसम | 11.8013865 | 2.87606877 |
| 30 | साग | 23.6027729 | 0.15871204 |
| 31 | सागवन | 35.4041594 | 16.27502752 |
| 32 | सावरून | 11.8013865 | 9.024986409 |
| 33 | सूर्या | 11.8013865 | 2.40415871 |
| 34 | हळदु | 11.8013865 | 2.714069794 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **896.905372** | |
| | | | |

| **भुदृश्य प्रकार** | **२१.विरळ वृक्ष डोंगराळ (बांबू)** | | |
|---|---|---|---|
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कढई | 46.7528673 | 0.003809766 |
| 2 | कोजब | 46.7528673 | 35.75376441 |
| 3 | गराडी | 280.517204 | 42.22846606 |
| 4 | धावडा | 46.7528673 | 7.29213093 |
| 5 | बांबू | 93.5057345 | 0 |
| 6 | भिवला | 46.7528673 | 0.00062876 |
| 7 | भेहडा | 46.7528673 | 48.21735554 |
| 8 | सागवन | 93.5057345 | 16.81654684 |
| 9 | सूर्या | 46.7528673 | 7.29213093 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **748.0458763** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **३. खूप कमी वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कोजब | 18.3099462 | 7.707843285 |
| 2 | गराडी | 73.2397848 | 15.47396894 |
| 3 | चीचवा | 18.3099462 | 12.25386806 |
| 4 | धावडा | 36.6198924 | 12.60356227 |
| 5 | पडरी | 36.6198924 | 6.192501694 |
| 6 | बांबू | 183.099462 | 0 |
| 7 | बीजा | 18.3099462 | 14.92028643 |
| 8 | मोहा | 18.3099462 | 3.730071609 |
| 9 | येन | 18.3099462 | 3.27838325 |
| 10 | सागवन | 146.47957 | 37.50470438 |
| 11 | सावली | 18.3099462 | 16.84360461 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **585.9182781** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | Bhehra | 0.30114732 | 0.027952243 |
| 2 | Bija | 0.90344197 | 0.164387177 |
| 3 | Charoli | 0.30114732 | 0.015337307 |
| 4 | Dhavda | 0.30114732 | 0.008627235 |

| | | | |
|---|---|---|---|
| 5 | Jhilbuli | 0.60229465 | 0.00375764 |
| 6 | Kasai | 0.30114732 | 0.002302993 |
| 7 | Kumbhi | 0.30114732 | 0.01941128 |
| 8 | Moha | 0.60229465 | 0.324578162 |
| 9 | Movai | 0.90344197 | 0.047643907 |
| 10 | Sag | 0.60229465 | 0.01271319 |
| 11 | Sihana | 0.60229465 | 0.065109266 |
| 12 | Tendu | 1.2045893 | 0.089771177 |
| 13 | Yen | 0.30114732 | 0.041755819 |
| 14 | आवडा | 0.90344197 | 0.108326178 |
| 15 | ओडचा | 0.30114732 | 0.046970504 |
| 16 | कडई | 0.30114732 | 0.067637525 |
| 17 | कसाई | 0.30114732 | 0.115988386 |
| 18 | काक ई | 0.30114732 | 0.064455034 |
| 19 | कुकुड दवणा | 0.30114732 | 0.065243467 |
| 20 | कोजब | 1.2045893 | 0.377741103 |
| 21 | खेर | 0.30114732 | 5.83201E-06 |
| 22 | ग राडी | 3.31262057 | 0.588389433 |
| 23 | गराडी | 2.71032592 | 0.493787004 |
| 24 | गारा डी | 0.90344197 | 0.014800502 |
| 25 | गोघर | 0.30114732 | 0.061349229 |
| 26 | चारोडी | 1.80688394 | 0.311898522 |
| 27 | चीचवा | 0.30114732 | 0.077645118 |
| 28 | जांभूळ | 0.30114732 | 1.05684E-05 |
| 29 | तेंदू | 0.90344197 | 0.127079177 |
| 30 | धावडा | 7.22753578 | 1.59497602 |
| 31 | धोबन | 0.60229465 | 0.074743012 |
| 32 | बांबू | 0.30114732 | 0 |
| 33 | बाहवा | 0.30114732 | 0.040500077 |
| 34 | बिवला | 0.30114732 | 0.277030113 |
| 35 | बीजा | 1.80688394 | 0.597196402 |
| 36 | बेल | 0.30114732 | 0.043675379 |
| 37 | बेहडा | 0.30114732 | 0.105683633 |
| 38 | बेहळा | 0.30114732 | 0.065243467 |
| 39 | भिवला | 0.60229465 | 0.324000616 |
| 40 | भेरा | 4.21606254 | 0.744357865 |
| 41 | मोवई | 2.10803127 | 0.647423687 |
| 42 | मोवाई | 1.80688394 | 0.302679938 |
| 43 | मोह | 1.50573662 | 0.061457528 |
| 44 | मोहा | 2.71032592 | 0.745776566 |

| | | | |
|---|---|---|---|
| 45 | येन | 7.5286831 | 1.415926144 |
| 46 | रोहन | 1.80688394 | 0.379586373 |
| 47 | रोहनी | 0.30114732 | 0.040500077 |
| 48 | लोकडी | 0.60229465 | 0.084175456 |
| 49 | शिसम | 0.30114732 | 0.077645118 |
| 50 | साग | 1.50573662 | 0.323526118 |
| 51 | सागवन | 6.32409381 | 1.753365761 |
| 52 | साल ई | 0.30114732 | 0.064455034 |
| 53 | सालं ई | 0.30114732 | 0.082907732 |
| 54 | सिहना | 1.2045893 | 0.199205261 |
| 55 | सुगवन | 0.30114732 | 0.046970504 |
| 56 | सूर्या | 0.30114732 | 0.196020373 |
| 57 | हळदु | 0.60229465 | 0.144086812 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **67.45700061** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **५.विरळ वृक्ष खडकाळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | आवडा | 7.14914754 | 1.147152312 |
| 2 | कसाई | 7.14914754 | 1.115065727 |
| 3 | ग राडी | 42.8948852 | 8.335912783 |
| 4 | गराडी | 35.7457377 | 6.764352801 |
| 5 | चारोडी | 7.14914754 | 1.196135556 |
| 6 | तेंदू | 7.14914754 | 0.991270675 |
| 7 | धावडा | 21.4474426 | 4.120338534 |
| 8 | पडरी | 7.14914754 | 1.644153036 |
| 9 | बांबू | 35.7457377 | 0 |
| 10 | बाबू | 7.14914754 | 0 |
| 11 | बीज | 7.14914754 | 2.508897885 |
| 12 | भेरा | 42.8948852 | 8.853678761 |
| 13 | मोवई | 35.7457377 | 5.598085077 |
| 14 | मोहा | 21.4474426 | 9.776736997 |
| 15 | येन | 21.4474426 | 3.06495158 |
| 16 | शिसम | 7.14914754 | 1.843271916 |
| 17 | सागवन | 28.5965902 | 6.441495761 |
| 18 | सिहना | 14.2982951 | 2.571478105 |
| 19 | सूर्या | 7.14914754 | 1.036840453 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **428.9488525** | |

| | | | |
|---|---|---|---|
| **भुदृश्य प्रकार** | **६.विरळ वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | काकीई | 2.25081104 | 0.376586872 |
| 2 | कारारूक | 6.75243311 | 3.086131655 |
| 3 | कोजब | 4.50162207 | 1.678296785 |
| 4 | गराडी | 69.7751421 | 14.69808262 |
| 5 | गोगर | 6.75243311 | 1.599486691 |
| 6 | गोटी | 2.25081104 | 0.376586872 |
| 7 | चीचवा | 2.25081104 | 1.031695783 |
| 8 | चेहरा | 2.25081104 | 0.403006165 |
| 9 | धावडा | 15.7556772 | 3.351220155 |
| 10 | बांबू | 4.50162207 | 0 |
| 11 | बीजा | 6.75243311 | 3.655713702 |
| 12 | भाहवा | 2.25081104 | 0.302702408 |
| 13 | भिवला | 2.25081104 | 1.834125836 |
| 14 | भेरा | 2.25081104 | 0.403006165 |
| 15 | येन | 4.50162207 | 0.806907899 |
| 16 | सागवन | 36.0129766 | 13.36646425 |
| 17 | सूर्या | 18.0064883 | 5.643877449 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **189.068127** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | ,गराडी | 10.5648579 | 0.000157796 |
| 2 | कसं ई | 10.5648579 | 0.980621265 |
| 3 | काक ई | 21.1297158 | 2.288452576 |
| 4 | खैर | 10.5648579 | 0.080793642 |
| 5 | गरा डी | 10.5648579 | 1.532220727 |
| 6 | गराडी | 137.343153 | 12.24432976 |
| 7 | गारडी | 10.5648579 | 0.086090207 |
| 8 | गोगर | 10.5648579 | 1.46487868 |
| 9 | चारोडी | 21.1297158 | 0.148468615 |
| 10 | चारोळी | 31.6945737 | 1.536676568 |
| 11 | धाव डा | 10.5648579 | 1.968052401 |

| | | | |
|---|---|---|---|
| 12 | धावडा | 42.2594316 | 4.661734271 |
| 13 | धोबन | 42.2594316 | 10.19955074 |
| 14 | पडरी | 10.5648579 | 0.000257472 |
| 15 | बिजा | 10.5648579 | 3.498759823 |
| 16 | बीजा | 31.6945737 | 3.134350872 |
| 17 | भेरा | 21.1297158 | 3.052503164 |
| 18 | भेहरा | 21.1297158 | 1.710454359 |
| 19 | मोह | 42.2594316 | 3.623984192 |
| 20 | मोहा | 10.5648579 | 0.075665221 |
| 21 | येन | 137.343153 | 14.08502206 |
| 22 | रोहन | 10.5648579 | 1.420824707 |
| 23 | रोहनी | 10.5648579 | 0.000150961 |
| 24 | शिसम | 10.5648579 | 1.767623637 |
| 25 | साग | 73.9540053 | 5.934002928 |
| 26 | साल ई | 10.5648579 | 2.344697057 |
| 27 | सेहना | 21.1297158 | 0.436033658 |
| 28 | सेहरा | 10.5648579 | 0.155449993 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **802.9292003** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **८. मध्यम वृक्ष खडकाळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कस ई | 2.54320651 | 0.909585409 |
| 2 | कसई | 2.54320651 | 0.331582577 |
| 3 | कसाई | 5.08641303 | 3.953025322 |
| 4 | कुडा | 2.54320651 | 0.368841093 |
| 5 | कोजब | 2.54320651 | 2.23073474 |
| 6 | कोयार | 2.54320651 | 0.093581411 |
| 7 | ग राडी | 35.6048912 | 5.278991343 |
| 8 | गरा डी | 10.1728261 | 1.653318815 |
| 9 | गराडी | 2.54320651 | 0.023395353 |
| 10 | गोघर | 5.08641303 | 1.248696595 |
| 11 | गोटी | 2.54320651 | 0.368841093 |
| 12 | चारोडी | 2.54320651 | 0.352630299 |
| 13 | चीचवा | 2.54320651 | 1.165719998 |
| 14 | चेहरा | 2.54320651 | 0.655717499 |
| 15 | धावडा | 22.8888586 | 2.711675192 |
| 16 | धोबन | 5.08641303 | 0.730705878 |

| | | | |
|---|---|---|---|
| 17 | बांबू | 38.1480977 | 0 |
| 18 | बिबा | 5.08641303 | 0.88693887 |
| 19 | बीजा | 15.2592391 | 6.13053361 |
| 20 | भिवला | 5.08641303 | 2.218834682 |
| 21 | भेरा | 2.54320651 | 0.467583243 |
| 22 | भेहरा | 5.08641303 | 0.040982344 |
| 23 | मोवई | 5.08641303 | 0.631856667 |
| 24 | मोह | 5.08641303 | 0.875666195 |
| 25 | मोहा | 5.08641303 | 0.519089448 |
| 26 | येन | 12.7160326 | 3.199274009 |
| 27 | रोहन | 2.54320651 | 0.023395353 |
| 28 | रोहनी | 2.54320651 | 0.39666861 |
| 29 | शिसम | 10.1728261 | 3.325641295 |
| 30 | साग | 17.8024456 | 2.559281588 |
| 31 | सागवन | 17.8024456 | 6.345893094 |
| 32 | सिहना | 2.54320651 | 0.352630299 |
| 33 | सूर्या | 12.7160326 | 1.784960377 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **274.6663035** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **९. मध्यम वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कसाई | 1.41972917 | 0.407852231 |
| 2 | कसेई | 1.41972917 | 0.498234997 |
| 3 | करारूक | 1.41972917 | 0.73464242 |
| 4 | कोजब | 4.2591875 | 2.058749941 |
| 5 | खासई | 1.41972917 | 0.254201529 |
| 6 | ग राडी | 2.83945834 | 0.546898095 |
| 7 | गराडी | 11.3578333 | 2.23589474 |
| 8 | चारोडी | 2.83945834 | 0.61375547 |
| 9 | तेंदू | 2.83945834 | 1.692699739 |
| 10 | धावडा | 4.2591875 | 0.953538181 |
| 11 | बांबू | 9.93810418 | 0 |
| 12 | बीजा | 2.83945834 | 3.078662966 |
| 13 | बेहडा | 1.41972917 | 0.271430744 |
| 14 | मोवई | 2.83945834 | 1.451773179 |
| 15 | मोहा | 4.2591875 | 2.264453095 |
| 16 | शिसम | 2.83945834 | 0.498311371 |

| | | | |
|---|---|---|---|
| 17 | सगवन | 2.83945834 | 0.776715597 |
| 18 | सागवन | 9.93810418 | 3.051895658 |
| 19 | सूर्या | 1.41972917 | 0.407852231 |
| 20 | हळदु | 1.41972917 | 0.205903239 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **73.82591674** | |



3.

वा

## शीट 1 (अन्न)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | तरोटा | पान | जुलै | 25 | 75 |
| 2 | कडू भाजी | पान | मे ते जून | 99 | 1 |
| 3 | चिपळी भाजी | पान | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 99 | 1 |
| 4 | शेरडीरा | देठ | जुलै ते ऑगष्ट | 99 | 1 |
| 5 | हळदुली | कांदे | डिसेंबर ते जानेवारी | 99 | 1 |
| 6 | पार्सेला | फळ | जानेवारी ते फेब्रुवारी | 99 | 1 |
| 7 | बोराभाजी | पान | जुलै ते ऑगष्ट | 99 | 1 |
| 8 | आंबा | फळ | मे ते जून | 25 | 75 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 9 | आवळा | फळ | जानेवारी ते एप्रिल | 99 | 1 |
| 10 | उमरून | फळ | मे ते जून | 25 | 75 |
| 11 | कचर कांदे | कांदे | एप्रिल ते मे | 99 | 1 |
| 12 | कवठ | फळ | एप्रिल ते मे | 99 | 1 |
| 13 | काटवल | फळ | जुलै ते सप्टेंबर | 1 | 99 |
| 14 | काटा कोहळा | फळ | नोव्हेंबर ते जानेवारी | 1 | 99 |
| 15 | काळी मुसळी | पान | जुलै ते ऑगष्ट | 99 | 1 |
| 16 | कोयार भाजी | पान | जून | 99 | 1 |
| 17 | कोजूब | फळ | जून ते जुलै | 99 | 1 |
| 18 | खोबर वेल | मूळ | नोव्हेबर ते जानेवारी | 99 | 1 |
| 19 | गवतीचाय | पान | बाराही महिने | 1 | 99 |
| 20 | चिंच | फळ | मे ते जून | 25 | 75 |
| 21 | बोदेले | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 70 | 30 |
| 22 | जांभूळ | फळ | जून ते जुलै | 70 | 30 |
| 23 | टेंभरून | फळ | एप्रिल ते मे | 99 | 1 |
| 24 | धोबे | पान | ऑगष्ट ते सप्टेंबर | 1 | 99 |
| 25 | पातुर भाजी | पान | जून ते जुलै | 99 | 1 |
| 26 | बेहळा | फळ | डिसेंबर ते जानेवारी | 99 | 1 |
| 27 | मटारु | फळ,कांदे | नोव्हेंबर ते डिसेंबर | 1 | 99 |

## 3.2 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 2 (चारा)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी वापर केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | बिलायकोजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 2 | दुधूम | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 3 | बोराभाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 4 | कोरहुची | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 5 | उतरण वेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 6 | उमरून | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 7 | उरसुळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 8 | एरोनी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 9 | कसई | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 10 | काटा भाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 11 | कुसार्या गवत | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 12 | खोबरवेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 13 | गराडी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 14 | चिंच | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 15 | चिकना | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 16 | जंगली तूर | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 17 | जंगली मुंग | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 18 | जवेला | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 19 | जांभूळ | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 20 | झिल्बुली | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 21 | डोर्ली वांगा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 22 | दुर्वा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |

## 3.3 वनस्पती वापर तपशील

### शीट 3 (जाळाऊ लाकूड)

| क्र. | उत्पादन वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | चिंच | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | रोहन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | झिलबुली | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | सिहाना | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 7 | भेरा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | आवळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 10 | चारा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.4 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 4 (घर बांधणी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | बांबू | ओला बांबू | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | सूर्या | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 7 | मोवई | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | अंजन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | हळदु | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.5 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 5 (कृषी अवजारे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | साग | नांगर,दांडी | मे ते जून | 10 | 95 | 5 |
| 2 | बोरी | नांगर | मे ते जून | 3 | 95 | 5 |
| 3 | भेरा | नांगर,दांडी | मे ते जून | 25 | 95 | 5 |
| 4 | कोजूब | नांगर | मे ते जून | 36 | 95 | 5 |
| 5 | अंजन | नांगर, दांडी | मे ते जून | 40 | 95 | 5 |
| 6 | बिजा | नांगर, दांडी | मे ते जून | 5 | 95 | 5 |
| 7 | धावळा | दांडी | मे ते जून | 40 | 95 | 5 |

## 3.6 वनस्पती वापर तपशील

## शीट 6 (कुंपण घालणे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | बांबू | ओला/सुका बांबू | मे ते जून | 97 | 95 | 5 |
| 2 | साग | वाळलेला लाकूड | मे ते जून | 50 | 95 | 5 |
| 3 | गराडी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 55 | 95 | 5 |
| 4 | येन | वाळलेला लाकूड | मे ते जून | 45 | 95 | 5 |
| 5 | बिजा | वाळलेला लाकूड | मे ते जून | 44 | 95 | 5 |
| 6 | पळस | वाळलेला लाकूड | मे ते जून | 67 | 95 | 5 |
| 7 | रोहणी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 70 | 95 | 5 |

## 3.7 वनस्पती वापर तपशील

## पत्रक 7 (संस्कृती)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | कारण |
|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | |
| 1 | मोह | फांदी,पान | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 2 | बांबू | बांबू | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 3 | साग | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 4 | जांभूळ | फांदी | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 5 | कोजूब | फांदी | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 6 | वराकली | फळ | मार्च ते मे | पूजेसाठी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 7 | कुळा | पान,शेंग | ऑगष्ट | पोळा सणाच्या वेळी |
| 8 | शिंदी | पान | मार्च ते मे | मोहूर/बाशिंग बनविण्यासाठी |
| 9 | माहूर | पान | मार्च ते मे | पत्राली |
| 10 | मोहई | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 11 | येन | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 12 | शतावरी | पान | ऑगष्ट | पोळा सणाच्या वेळी |
| 13 | बेल | पान | हमेशा | पूजेसाठी |
| 14 | बोर | फळ | जानेवारी | वान वाटणी |
| 15 | भेरा | पान | ऑगष्ट | पोळ्यासाठी |
| 16 | तुळशी | पान | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 17 | दुर्वा | पान | बाराही महिने | पूजेसाठी |
| 18 | पळस | पान | मार्च ते मे | पत्रावळी |
| 19 | परसोड | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | दिवाळी साठी |
| 20 | कडूनिंब | पान | मार्च | पूजेसाठी |
| 21 | चिंच | फळ | बाराही महिने | आंबट टाकण्यासाठी |
| 22 | आंबा | पान,फळ | मार्च | नवा साठी व पूजेसाठी |
| 23 | करकरी | फुल | ऑगष्ट | पोळ्यासाठी |
| 24 | आवळा | फळ | जानेवारी | नवा पोलोच्या वेळी |
| 25 | उमरून | पान,फळ | बाराही महिने | पूजेसाठी |

## 3.8 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 8 (वन औषधी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | नांगेलमाटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 2 | कांदाळ उल्ली | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 3 | कर्वूलमाटी | कांदा | जून ते जुलै | 95 | 5 |
| 4 | हिर माटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 5 | नसतोंडा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 6 | अदरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 7 | पार्सेला | पंचांग | ऑगष्ट | 95 | 5 |
| 8 | कटूल कोसा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 9 | दुधूम | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 10 | नयनेंडी | पंचांग | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 11 | मस्या | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 12 | डोकेमरा | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 13 | हिवीर | मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 14 | मूसतुमीर | फळ | डिसेम्बर | 95 | 5 |
| 15 | तिरका | फळ | डिसेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 16 | सिरेल | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 17 | चंद्रीमरा | साल,मूळ | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 18 | नाचुम | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 19 | कोरकोट जपी | पान,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 20 | बोराभाजी | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 21 | अडूळसा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 5 | 95 |
| 22 | झरका | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 23 | आघाडा | पंचांग | जून ते जानेवारी | 95 | 5 |
| 24 | अंजन | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 25 | आटइ | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 26 | आपटा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 27 | आंबा | पान,साल | बाराही महिने | 5 | 95 |
| 28 | उतरणवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 29 | उमरून | पंचांग | बाराही महिने | 50 | 50 |
| 30 | उरसुळी | पंचांग | जून ते मार्च | 50 | 50 |
| 31 | कचर कांदे | कांदा | नोव्हेंबर ते जून | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 32 | कडूनिम | पंचांग | बाराही महिने | 50 | 50 |
| 33 | करकरी (पोरा पुंगार) | पंचांग | ऑगष्ट | 50 | 50 |
| 34 | रक्त रोहणी | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 35 | खैर | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 36 | कोजूब | साल,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 37 | खोबरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 38 | गराडी | साल,पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 39 | गवती चाय | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 40 | गुळवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 41 | घंटा | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 42 | घोटी | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 43 | चिकना | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 44 | भूतगांजा | बीज | जून नोव्हेंबर | 95 | 5 |
| 45 | जोन्दुरली | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 46 | डिकेमाली | डींक | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 47 | देन्डोरा | पंचांग | ऑगष्ट ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 48 | डोर्ली वांगा | पंचांग | नोव्हेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 49 | तुळशी | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 50 | तेंदू | पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 51 | तेल दोडका | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 52 | दुर्वा | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 53 | देव तरोटा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 54 | धावळा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 55 | धोबा | पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 56 | निर्गुंडी | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 57 | पडोरा | फळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 58 | परसोड | बीज | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 59 | पळस | मूळ,बी,साल | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 60 | पळसवेल | मूळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 61 | पातुरवेल | मूळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 62 | बहावा | फुल | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |

## 3.9 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 9 (इतर)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |

## 3.10 समुदायाने विक्रीसाठी जमा केलेल्या वनउपजचे विश्लेषण

| क्र. | वनउपजाचे नाव | वनउपज संग्रहाचे हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | वनउपज विक्रीचे हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | वनउपजाचे सरासरी बाजार किमत | मूल्यवृद्धी | विक्रीची जागा | समुदायीक क्षेत्रातून गोळा केलेले प्रमाण | इतर वन क्षेत्रातून गोळा केलेले प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | मोह | फेब्रुवारी ते मार्च | 31 | एप्रिल ते मे | ५ क्विंटल | २५ | | फिरते व्यापारी | ५०% | ५०% |
| 2 | चार | एप्रिल | 31 | मे | २५ किलो | १९० | | फिरते व्यापारी | १००% | |
| 3 | तेंदू | मे | 31 | मे | १०० मुडके एक व्यक्ती | | | फिरते व्यापारी | ९०% | 10% |

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 4 | तरोटा | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 31 | डिसेम्बर | 6 किलो | २५ | | फिरते व्यापारी | ७०% | ४०% |
| 5 | चिंच | मे | 31 | जून | 20 किलो | 35 | | फिरते व्यापारी | ५०% | ५०% |
| 6 | टोरी | जून | 31 | जून | ४० किलो | २५ | | फिरते व्यापारी | ५०% | ५०% |
| 7 | बेहडा | जानेवारी ते मार्च | 31 | मार्च | ४० किलो | 7 | | फिरते व्यापारी | १००% | |

## 4. ग्रामसभा सक्षमीकरण

## 4. ग्रामसभा सक्षमीकरण

### 4.1 हक्क :- बंधने, कर्तव्य व नियमांचे पालन केल्यास खालील हक्क राहतील.



१) गौणउपज वापराचे
२) मत्स्य व्यवसाय करण्याचे
३) इमारत लाकूड वापरण्याचे
४) खनिज वापराचे
५) पाणीसाठे वापरण्याचे
६) संस्कृती जोपासण्याचे

### 4.2 नियम

**(A) जंगल गस्तीचे नियम :**

1) व्यक्तींच्या यादी नुसार गावातील एकूण घरांपैकी 3 घर मिळून तिघे जण गस्तीवर जातील.
2) तिघे जण तीन दिवस जातील. परंतु याच अर्थ एकटा जर एकच दिवस गेला तर होईल असे समजू नये.
3) जाण्याआधी ऑफिस मध्ये जाऊन गस्ती बुकवर सही मारणे आवश्यक असेल. तसेच वापस आल्यानंतर सुद्धा सही मारावी.
4) गस्तीवर जाण्यास अडचण असेल तर किमान दोन दिवसा आधी सांगावे, अथवा वेळेवर माहिती दिल्यास त्याच्या ठिकाणी कुणी जाणार असेल तर तो स्वतः कुणाला तरी तयार करील.
5) गस्तीवर जाण्यास अडचण असल्यास कोणीतरी दुसरा व्यक्ती पाठवावे किंवा ग्रामसभेने पाठविलेल्या व्यक्तीला त्याची त्या दिवशीची रोजी म्हणून 300 रुपये द्यावे लागतील.
6) आज पाळी असून मी काही कारणाने आज न जाता उद्या जाईन असे असल्यास तसे वेळेवर सांगता येणार नाही किंवा पाळीवर सोबत असणाऱ्यांना काही अडचण नसल्यास आपसात ठरवावे.
7) पाळीवर 2 व्यक्तीपेक्षा कमी जाता येणार नाही.

8) गस्तीवर असतांना जर कुणाला कोणत्याही प्रकारची हानी पोहचल्यास तुरंत सर्वांनी मिळून त्याला घरापर्यंत पोहचवावे. आणि वेळ बाकी असल्यास बाकीचे पुन्हा परत जावे.

### (B) चराईचे नियम :

1) रोज रोज एकाच ठिकाणी चराई करण्यासाठी नेता येणार नाही
2) देवराई/पेनगेडा ठेवलेल्या जंगलात गुरे चारण्यास मनाई.
3) बाहेर गावातील लोकांना आपल्या हद्दीत गुरे चारू देण्यासाठी अगोदर पास काढणे आवश्यक आहे.
4) शेळ्याना चारा म्हणून कोणत्याही झाडाचे फांद्या तोडता येणार नाही.

### (C) गौणवनोपज गोळा, विक्री आणि वापराचे नियम :

1)गावातील लोकांना निस्तार आणायचे असल्यास जगंलाती वाळलेले लाकूड आणावे.
2) ओले लाकूड तोडता येणार नाही.
3) जंगलातून गरजेपेक्षा जास्त निस्तार आणल्यास तो जप्त केले जाईल आणि तोच निस्तार दुसऱ्या गरजू व्यक्तीला दिले जाईल.
4) कोणाला लग्नासाठी वगैरे वनोपज जास्ती प्रमाणात लागत असल्यास तसे आधीच ग्रामसभेला कळवण्यात यावे.
5)ग्रामसभेला विचारल्या जगंलातून निस्तार आणू शकत नाही.
6) शिवरासाठी लाकूड तोडत असतांना आधी निस्तार बुकात संख्यांची नोंद करावी. व जेवढे लागतात तेवढेच तोडावे वाया जाऊ देऊ नये.
7) वासते आणतांना मोठे झालेले वासते आणू नये. असे आढळल्यास दंडात्मक कार्यवाही होईल.

### (D) बाहेरील व्यक्तीसाठी नियम :

1) ग्रामसभेतून पास काढल्याशिवाय जंगलातून काहीही नेता येणार नाही.
2) तेंदू सारखे वनोपज न्यायचे असल्यास ते तोडून आमच्या ग्रामसभेतच त्याची विक्री करावी लागेल.
3) मोह फुल गोळा करत असताना त्या झाडाखाली आग लावता येणार नाही
4) बाहेरील व्यक्ती पास घेऊन सुद्धा असेल तरी त्याला माचीस घेऊन जंगलात जाता येणार नाही.
5) जंगलात आल्यानंतर पास असूनही कोणतीही वनस्पती व्यर्थ तोडल्यास दंडात्मक कार्यवाही होईल.

### (E) पेनागेडा असल्यास त्या संबंधी नियम :

सीनसुर गावा मध्ये आधी पेनगे डा नव्हते आता सण 20017 पासून ठेवण्यात आले व त्या पेणगेडा मध्ये कोणताही माल आणण्यास सक्त मनाई आहे असे सर्व सहमतीने ठरविण्यात आले आहे

### (F) इतर ग्रामसभाशी संबंध ;

गावाजवळ असलेले सर्व ग्रामसभा एकत्र मिळून तेंदू लिलावसारख्या प्रक्रियेत सहभाग घेतात. एखाद्या गावाला काही अडचण किंवा फसवणूक झाल्यास ते आधी आपल्या जवळच्या ग्रामसभाशी चर्चा करून नंतर महासंघमध्ये विषय मांडतात.

### (G) बँक खाते संबंधी नियम :

1) कोणालाही पैशाची देवाण घेवाण करत असताना त्याची पावती देने आणि घेणे बंधनकारक राहील.
2) झालेल्या खर्चाचा तपशील दर महिन्याच्या 1 तारखेला दाखविणे बंधनकारक राहील.
3) आर्थिक व्यवहार शक्य तो ऑनलाइन पद्धतीनेच करावा.
4) कोणतीही मोठी रक्कम देवाण घेवाण करायची असल्यास त्याआधी ग्रामसभेची परवानगी घेणे आवश्यक असेल.
5) ग्रामसभेचे पैसे कुंत्याही व्यक्तीला व्यक्तिगत देता येणार नाही.

### (H) आर्थिक व्यवहाराचे हिशोब ठेवण्याचे नियम :

1) दर महिन्याच्या 1 तारखेला झालेल्या खर्चाचा तपशील ग्रामसभेपुढे मांडावे.
2) हिशोब मागाची जबाबदारी ही गावातील प्रत्येक व्यक्तीची असेल.
3) कुणाला हिशोबामध्ये काही घोळ वाटत असेल तर तसे सरळ ग्रामसभेमध्ये मांडावे.
4) हिशोब मागत असताना कोणत्याही वेळी किंवा कुठेही हिशोब मागता येणार नाही फक्त ग्रामसभेत किंवा हिशोबाच्या दिवशीच मागता येईल.

### (I) लेखापरीक्षण अथवा ऑडीट बाबत नियम:

1) कोणत्या ठिकाणी किती कर बसते आहे. मग त्या वस्तूची गरज आपल्याला आहे किंवा नाही यावर विचार करावे.
2) जे काही कर असेल ते नियमानुसार भरावे.

